Development of mobile/web based application for Reservior Status या प्रणालीस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत......

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: ईप्रमं-२०१७/१७८/प्र.क्र.६५/निवसं-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२**
**दिनांक :- २७ जुलै, २०१७**

वाचा :- १. शासन निर्णय क्र. ई-प्रशासन -२०१६/(३६/२०१६)/लपा-१/दि.०२/०४/२०१६
२. अधिक्षक अभियंता ई-प्रशासन मंडळ मुंबई यांचे पत्र क्र.ईप्रमं/(२६-१७)/२०१७ दिनांक १५.७.२०१७

प्रस्तावना :

विभागांतर्गत असलेल्या सर्व पाटबंधारे प्रकल्पांवरील विविध जलाशयांचा दैनंदिन पाणीसाठा ई-जलसेवामधील M-२ मोडयुलमध्ये SMS व्दारे अद्ययावत केला जातो. सदर पाणीसाठ्याचा अहवाल ई-जलसेवा प्रणाली मधून extract करून PDF स्वरूपात रूपांतरीत करून संकेतस्थळावर Upload केला जातो.

ई-गव्हर्नन्स व एम-गव्हर्नन्स धोरण राबविणे करीता जलसंपदा विभागामार्फत दि.२.४.२०१६ च्या शासन निर्णयान्वये ई-प्रशासन मंडळाची स्थापना करण्यात आली असून विभागाकडून पुरविण्यात येणा-या सुविधा अधिक जलदगतीने जनतेपर्यंत पोहचविणे हा त्याचा उद्देश आहे. मोबाईलची वाढती लोकप्रियता व माहिती उपलब्धतेची सुलभता लक्षात घेता धरणांचा दैनंदिन पाणीसाठाबाबतची माहिती संबंधितांना सहजरित्या मिळण्याच्या दृष्टीने मोबाईल ॲप उपलब्ध करणे आवश्यक आहे. सदर ॲप विकसीत केल्यानंतर मोबाईलव्दारे सहजतेने पाणीसाठा अहवाल व संलग्न इतर माहिती सर्व सामान्य नागरिकांना तसेच अधिकारी वर्गास उपलब्ध होऊ शकेल. सदर प्रणाली विकसित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

धरणांच्या दैनंदिन पाणीसाठयाबाबतची माहिती सर्व प्रकारच्या मोबाईलवर विविध प्रकारे विविध वापरकर्त्यांना सहज उपलब्ध होण्यासाठी मोबाईल ॲप विकसित करण्यास व त्यासाठीच्या " Development of mobile/web based application for Reservior Status" या प्रकल्पाच्या अंदाजित रू.९,९०,०००/- (अक्षरी रूपये नऊ लाख नव्वद हजार फक्त) एवढ्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

या योजनेच्या कामावरील खर्च मुख्य लेखाशिर्ष ,"-३४५१सचिवालयीन आर्थिक सेवा, ९०- सचिवालय, ०१- जलसंपदा विभाग, -(०३)(०१)ई प्रशासन प्रकल्प,१७ - संगणकीय खर्च - (३४५१-२७१९)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व तो सन २०१७ - १८ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय जलसंपदा विभागाचे आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांचे सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०७२७१२०२५९५१२७ असा आहे. . हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Madhukar Belsare

Digitally signed by Sanjay Madhukar Belsare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=544e07f06fbab100dc2bfe33db79fc14350d78d6c16f8feab484d842c496717d, cn=Sanjay Madhukar Belsare
Date: 2017.07.27 12:10:49 +05'30'

**(डॉ. संजय बेलसरे)**
शासनाचे उपसचिव

**प्रत:-**

१. मा.मंत्री, (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
३. सर्व मा.विधानसभा सदस्य / विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र राज्य,मुंबई
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
५. महालेखापाल, (लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,मुंबई / नागपूर
६. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
७. प्रधान सचिव (मा.तं.) माहिती तंत्रज्ञान विभाग यांचे स्वीय सहाय्यक
८. सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहाय्यक
९. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहाय्यक
१०. मुख्य अभियंता (द्र. व प्र.) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११. आंतरवित्तीय सल्लागार व उपसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२. सर्व उपसचिव जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१३. सर्व अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग,
१४. अधिक्षक अभियंता, जलसंपदा ई-प्रशासन मंडळ, मुंबई.
१५. कार्यासन निवसं-३ संग्रहार्थ.